महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाचे अध्यक्ष व सदस्य यांना नैमित्तिक रजा मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्र. एचआरसी-१३२००१/संकीर्ण-१३५/पोल-१४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- २५ मे, २००५

**शासन निर्णय:-** मानवी हक्क संरक्षण अधिनियम, १९९३ मधील कलम २१ च्या तरतूदीनुसार महाराष्ट्र राज्यात राज्य मानवी हक्क आयोगाची स्थापना दि.१५.०१.२००० पासून करण्यात आली सदर मानवी हक्क संरक्षण अधिनियमातील कलम ४१ च्या पोट कलम (१) व पोट कलम (२) च्या खंड (अ) मधील तरतूदीनुसार गठीत करण्यात आलेल्या महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, २००० मधील नियम ५ अनुसार मा.अध्यक्ष व सदस्य यांचे रजाविषयक नियम विहित करण्यात आले आहेत. व नियम ७ अनुसार त्यांना कोणत्याही प्रकाराची रजा मंजूर करण्याचे अधिकार केवळ मा.राज्यपाल यांना आहेत. यामध्ये नैमित्तिक रजा मंजूर करण्याबाबतचा उल्लेख नाही.

२. या संदर्भात मा.राज्यपाल यांच्या सहमतीने असा निर्णय घेण्यात येत आहे की, राज्य मानवी हक्क आयोगाचे मा.अध्यक्ष यांचे संदर्भात मा.अध्यक्ष हे स्वत:च नैमित्तिक रजा मंजूर करण्यास समक्ष प्राधिकारी असतील तर, मा.सदस्य यांची नैमित्तिक रजा मंजूर करण्यास मा.अध्यक्ष हे समक्ष प्राधिकारी असतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

२५/०५/०५

( सं.द.माने )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. राज्यमंत्री यांचे (गृह) यांचे खाजगी सचिव
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता.)-१ महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र मुंबई
* सचिव, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई
उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
अधिदान लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
*पत्राने